बाल न्याय अधिनियम, २००० मधील कलम २९ आणि कलम ४ अन्वये स्थापन करण्यात येत असलेल्या बाल कल्याण समिती आणि बाल न्याय मंडळाच्या सदस्यांना बैठक भत्ता, वाहन भत्ता, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देणेबाबत.

---

# महाराष्ट्र शासन

महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र. जेजेए-२००४/प्र.क्र.९७/का-३,
नविन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई - ४०००३२
दिनांक : १३ जुले, २००४.

**वाचा :** १. बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम - २०००
२. महाराष्ट्र बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) नियम, २००२.

**शासन निर्णय :** बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २००० अंतर्गत कलम २९ अन्वये काळजी व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांकरीता बाल कल्याण समिती आणि कलम ४ अन्वये विधी संघर्षग्रस्त मुलांसाठी बाल न्याय मंडळ गठीत करण्यात येत आहेत.

२. सांविधानिक समित्यांच्या अशासकीय सदस्यांना बैठक भत्ता, वाहन भत्ता, प्रवास भत्ता, दैनिक भत्ता लागू करण्यासंबंधीच्या वित्त विभागाच्या क्र. मुंविनि-१०९५/प्र.क्र.१२/९५/विनियम, दिनांक १५/६/१९९५ आणि क्र. प्रवास-१०९८/प्र.क्र.७४/९८/सेवा-५, दिनांक ४ डिसेंबर, १९९९ च्या शासन निर्णयानुसार बाल कल्याण समिती अध्यक्ष व सदस्य आणि बाल न्याय मंडळाचे सदस्य यांना बैठक भत्ता, प्रवास भत्ता, दैनिक भत्ता, वाहन भत्ता वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक १५/६/१९९५ आणि दिनांक ४/१२/१९९९ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे खाली दर्शविल्याप्रमाणे लागू करण्यास शासन मंजूरी देत आहे.

१. **बैठक भत्ता :** बाल कल्याण समिती व बाल न्याय मंडळ.
अध्यक्ष व सदस्यांना प्रति बैठक रु. १५०/-

२. **वाहन भत्ता :** (अ) बैठकीच्या ठिकाणापासून ८ कि.मी. पर्यंत निवासस्थान ते बैठकीचे ठिकाण व तेथून परत येण्यासाठी टॅक्सी / रिक्षा भाडयाची प्रतिपूर्ती किंवा
(ब) निवासस्थानापासून जवळचे रेल्वे स्टेशन ते बैठकीच्या ठिकाणापासून जवळचे रेल्वे स्टेशन या दरम्यानचे रेल्वे गाडीच्या प्रथम वर्गाच्या भाडयाची प्रतिपूर्ती.

३. **प्रवास भत्ता व दैनिक भत्ता :** अध्यक्ष / अशासकीय सदस्य बैठकीच्या ठिकाणापासून ८ कि.मी. च्या पलिकडे रहात असल्यास त्यांना शासन निर्णय वित्त विभाग क्र. प्रवास-१०९८/प्र.क्र.७४/ ९८/सेवा-५, दिनांक ४ डिसेंबर, १९९९ मधील परिच्छेद ११ मध्ये नमूद केल्यानुसार रु. १६,४००/- व त्याहून अधिक वेतन घेणा-या शासकीय कर्मचा-यांच्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. मात्र त्यांना विमान प्रवास आणि रेल्वेच्या वातानुकूलित प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही.

३. यावरील खर्च शासकीय संस्थांचे बाबतीत २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०२ बालकल्याण (०१) (०४) बाल न्याय अधिनियमाखालील शासन प्रमाणित गृहे व सुधार गृहे सुरु करणे व त्यांचे परिरक्षण (२२३५३०३२) योजनेत्तर - मागणी क्र. एक्स०-१ आणि स्वयंसेवी संस्थांचे बाबतीत २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०२ बालकल्याण (०२)(०३) जपणूक व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (२२३५३०४१) ४१ - सहाय्यक अनुदाने, योजनेत्तर मागणी क्र. एक्स - १ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय मुविनि-१०९५/प्र.क्र.१२/९५/विनिमय, दिनांक १५/६/१९९५ आणि शासन निर्णय क्र. प्रवास-१०९८/प्र.क्र.७४/९८/सेवा—५, दिनांक ४ डिसेंबर, १९९९ मधील तरतूदीनुसार विविअनौ संदर्भ क्र. ७१०/०४/व्यय, दि. ६/७/२००४ व अनौस-३५३/०४/विनिमय, दि. ८/७/२००४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( पां. वि. केरकर )
शासनाचे उप सचिव.

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
सर्व कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, (सेवा-५) (व्यय-१४), विनियम, मंत्रालय, मुंबई.
अध्यक्ष, बाल कल्याण समिती / बाल न्याय मंडळ (सर्व)
सदस्य, बाल कल्याण समिती / बाल न्याय मंडळ (सर्व)
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
निवड नस्ती : का-३.